**राष्ट्रीय नदी संवर्धन योजनेंतर्गत मुळा-मुठा नदी, पुणे प्रदूषण कमी करण्याचा प्रकल्प या केंद्र शासन पुरस्कृत योजनेंतर्गत कामे राबविण्यासाठी पुणे महानगरपालिकेने SNA खात्यात जमा केलेला मॅचिंग हिस्सा पुणे महानगरपालिका यांना खर्चासाठी उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : रानयो-२०२२/प्र.क्र.१८२/आस्थापना-अ**
नविन प्रशासन भवन, १५वा मजला,
हुतात्मा राजगूरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २१/०३/२०२३.

**संदर्भ-** १) भारत सरकार यांच्या वित्त मंत्रालाचे कार्यालयीन ज्ञापन F. No. १ (१३) PFMS / FCD / २०२०, दि.२३.०३ २०२१.
२) भारत सरकार याच्या जलशक्ती मंत्रालयाचे पत्र क्र. -२७०१७/३/२०१२-NRCD-II (Vol-Pt. File II., दि. २८ सप्टेंबर २०२२.
३) शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्रमांक रानयो- २०२२ / प्रक्र १८२ / आस्थापना-अ, दि.२२ नोव्हेंबर,२०२२.
४) शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्रमांक रानयो- २०२२ / प्रक्र १८२ / आस्थापना-अ, दि.२३ जानेवारी,२०२३.

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय नदी संवर्धन योजनेंतर्गत पुणे शहरातील मुळा-मुठा नदी संवर्धन करण्याच्या प्रस्तावासाठी केंद्र शासनामार्फत एकूण निधी रू. ९९०.२६ कोटी (अक्षरी रु. नऊशे नव्वद कोटी सव्वीस लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास सन २०१६ मध्ये मजूरी दिलेली आहे. सदर प्रकल्पातील एकूण प्रस्ताव रकमेच्या ८५ टक्के हिस्सा (रु. ८४१.७२ कोटी) हा केंद्र शासनाचा व उर्वरित १५ टक्के हिस्सा (रु. १४८.५३ कोटी) हा पुणे महानगरपालिकेचा आहे.

२. केंद्र शासनाने संदर्भिय वाचा क्र.१ अन्वये, केंद्र पुरस्कृत योजनांना निधी वितरित करण्यासाठी व त्यावर देखरेख ठेवण्यासाठी सुधारित कार्यपद्धती अमलात आल्याबाबत कळविले आहे. तसेच त्यात दिलेल्या कार्यपद्धतीनुसार सर्व केंद्र पुरस्कृत योजनाबाबत कार्यवाही करण्याबाबत निर्देश देण्यात आलेले आहेत. त्यानुसार केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा निधी वितरित करण्यासाठी बँक ऑफ

महाराष्ट्र या बँकेत Single Nodal Account (मंत्रालय शाखा खाते क्र.६०४००९८२५३, IFSC- MAHB०००१३८८) खाते उघडण्यात आले आहे.

३. संदर्भिय वाचा क्र.२ अन्वये केंद्र शासनाने या प्रकल्पासाठी रु.६३,००,००,०००/- (रु. त्रेसष्ट कोटी फक्त) इतका निधी वितरीत केला असून सदर निधी संदर्भ क्र. ३ अन्वये योजनेसाठीच्या SNA खात्यात जमा झालेला आहे. तसेच संदर्भ क्र. ४ अन्वये सदर निधी SNA खात्यातून पुणे महानगरपालिका यांना वितरित करण्यात आलेला आहे. केंद्र शासनाच्या दि.२३.०३.२०२१ रोजीच्या सुधारित कार्यपद्धतीनुसार पुणे महानगरपालिकेने दि.१७ फेब्रुवारी, २०२३ रोजी मॅचिंग हिस्सा रु.११,११,७६,४७१/- इतका निधी या योजनेसाठीच्या SNA खात्यात (मंत्रालय शाखा खाते क्र.६०४००९८२५३, IFSC- MAHB०००१३८८) जमा केला आहे. सदर निधी PFMS प्रणालीमार्फत पुणे महानगरपालिका यांना खर्चासाठी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. केंद्र शासनाकडून केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोगामध्ये अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने सार्वजनिक वित्तीय प्रणाली (PFMS) द्वारे निधी वितरित करण्यास सुरूवात करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने National River Conservation Plan ही केंद्र पुरस्कृत योजना PFMS प्रणालीवर मॅप केलेली आहे.

२. राष्ट्रीय नदी संवर्धन योजनेंतर्गत सुधारित कार्यपद्धतीनुसार प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे मुळा-मुठा नदीच्या संवर्धनासाठी पुणे महानगरपालिकेने SNA खात्यात जमा केलेला समरूप हिस्सा रुपये रु.११,११,७६,४७१/- (रु. अकरा कोटी अकरा लक्ष शहात्तर हजार चारशे एक्काहत्तर फक्त) इतका निधी PFMS प्रणालीद्वारे आयुक्त, पुणे महानगरपालिका यांना खर्चासाठी उपलब्ध करण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर योजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून PFMS प्रणालीच्या सुधारित कार्यपद्धतीनुसार या योजनेकरिता Single Nodal Agency म्हणून सहसचिव पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय यांची नियुक्ती करण्यात आलेली आहे.

४. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत केंद्र शासनाची दि.२३.०३.२०२१ रोजीची सुधारित कार्यपद्धती/मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता आयुक्त, पुणे महानगरपालिका यांनी घ्यावी.

५. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ४ एप्रिल, २०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२११२४९५११९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2023.03.21 12:54:02 +05'30'

**( सु. कि. निकम ),**
**सह सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल),**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री(पर्यावरण व वातावरणीय बदल) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, पुणे महानगरपालिका.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई-४०००२०
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०००२०
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
११. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१४. निवासी लेखाधिकारी, मुंबई
१५. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
१६. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधीलेखा, कोकण भवन, मुंबई
१७. वित्त विभाग (व्यय-१६)
१८. नियोजन विभाग (कार्यासन-१४७२)
१९. पर्यावरण व वातावरणीय बदल विभागातील सर्व कार्यासने
२०. निवड नस्ती.